**श्री. मधुकर यशवंत देवडे, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)**
**यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-पकानि-१५१५/१२३३/प्र.क्र.२३१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
**दिनांक :- १९ सप्टेंबर, २०१५.**

पहा :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/१२/६४८/प्र.क्र.१२९/नवि-२७, दि.२५.१०.२०१२.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/उसंनर/ना.नि./प्रशा-१/६२५३, दि.२५.१०.२०१२.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/मयदे/उसंनर-प.का/प्रशा-१/६८, दि.२७.०८.२०१५ व पत्र क्र.आस्था/मयदे/उसंनर-प.का/प्रशा-१/७५, दि.०४.०९.२०१५.

प्रस्तावना :-

नगर विकास विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.२५.१०.२०१२ अन्वये श्री. मधुकर यशवंत देवडे, तत्कालीन सहाय्यक संचालक, नगर रचना यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून सरळसेवेने "उप संचालक, नगर रचना" (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५,६००-रु.३९,१००-ग्रेड पे रु.७,६००/-) पदावर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती या पदावर पदस्थापना करण्यात आली होती. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या **संदर्भ-२** येथील दि.२५.१०.२०१२ च्या कार्यकारी आदेशान्वये श्री. म. य. देवडे हे उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती या पदावर दि.२९.१०.२०१२ (म.पू.) पासून रुजू झाले होते. तद्नंतर त्यांची दि.०४.०३.२०१४ पासून पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, जि. पुणे या कार्यालयात प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेली आहे.

०२. श्री. म. य. देवडे यांचा उप संचालक, नगर रचना पदाचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.२८.१०.२०१४ रोजी संपुष्टात येणे आवश्यक होते. तथापि त्यांनी दि.२९.१०.२०१४ ते दि.२८.१०.२०१४ या दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीत खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार एकूण २७ दिवसांच्या कालावधीकरिता रजा उपभोगलेल्या आहेत.

| अ. क्र. | रजेचा कालावधी | | एकूण दिवस | रजेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| | पासून | पर्यंत | | |
| १ | ०२.११.२०१२ | ०६.११.२०१२ | ०५ | अर्जित |
| २ | २४.१२.२०१२ | २९.१२.२०१२ | ०६ | अर्जित |
| ३ | १५.०२.२०१३ | १८.०२.२०१३ | ०४ | अर्जित |
| ४ | ०१.०४.२०१३ | ०६.०४.२०१३ | ०६ | परिवर्तीत |
| ५ | २९.०५.२०१३ | ०३.०६.२०१३ | ०६ | अर्जित |
| | | **एकूण :-** | **२७** | **अर्जित** |

०३. श्री. म. य. देवडे, उप संचालक, नगर रचना यांनी परिविक्षा कालावधी दि.२९.१०.२०१२ ते दि.२८.१०.२०१४ मध्ये वरीलप्रमाणे २७ दिवसांची अर्जित रजा उपभोगल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी २७ दिवसांनी वाढून दि.२४.११.२०१४ (म.नं.) रोजी संपुष्टात येईल.

०४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-३** येथील दि.२७.०८.२०१५ च्या पत्रान्वये श्री. म. य. देवडे, उप संचालक, नगर रचना यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची “उप संचालक, नगर रचना) गट-अ / राजपत्रित)” पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०५.** सबब, श्री. म. य. देवडे, उप संचालक, नगर रचना यांचा दि.२९.१०.२०१२ (म.पू.) पासून सुरु झालेला दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. मधुकर यशवंत देवडे, उप संचालक, नगर (गट-अ / राजपत्रित) हे “उप संचालक, नगर रचना” पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तींची तसेच अन्य सेवाविषयक बाबींची पूर्तता करित असून त्यांनी दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम, ३९ अपवाद १ (ए) (दोन) मधील तरतुदीनुसार त्यांचा “उप संचालक, नगर रचना” पदाचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.२४.११.२०१४ (म.नं.) पासून संपुष्टात आणण्यात येत असून त्यांची “उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना पीबी-३, रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.७,६००) पदावर दि.२५.११.२०१४ (म.पू.) पासून नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

**०२.** सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/१८३७/प्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५०९१९१३१०२५८४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.09.19 13:14:24 +05'30'

**(एस. के. सालीमठ)**
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

**प्रति,**

श्री. मधुकर यशवंत देवडे, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित), पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, आकर्डी रेल्वे स्थानकाजवळ, पुणे-४११ ०४४, यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, तळ मजला, पुणे. **(०३-प्रती)**
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, आकुर्डी रेल्वे स्थानकाजवळ, पुणे-४११ ०४४.
६. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
७. उप संचालक, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, आकुर्डी रेल्वे स्थानकाजवळ, पुणे-४११ ०४४.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. निवडनस्ती / नवि-२७.

*****